केंद्र पुरस्कृत कृषि उन्नती योजना- कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणा करण्याकरिता सहाय्य (आत्मा) योजनेकरिता सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता केंद्र शासनाकडून प्राप्त निधी वितरीत करणेबाबत..
(लेखाशिर्ष २४०१ A५१२) ( केंद्र हिस्सा )

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी -२०१८ / प्र.क्र.११ / कार्यासन.६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
तारीखः - ११ फेब्रुवारी, २०१९.

**वाचा -**

१) शासन परिपत्रक,वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१८ /प्र.क्र.६९ / अर्थ-३, दि. ०२.०४.२०१८.
२) केंद्र शासन, कृषि आणि शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्र.एफनं.३६-२८/२०१७-अेई, विस्तार कक्ष, दिनांक २५.०६.२०१८.
३) शासन परिपत्रक,वित्त विभाग क्र.पूरक-२०१८ /प्र.क्र.१३५ / अर्थ-३, दि. ०५.१२.२०१८.
४) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग समक्रमांक दि.२७.०८.२०१८
५) कृषि व पदुम विभाग, नस्ती क्र. संकिर्ण २०१८/प्र. क्र.१९३/३-अे.

**शासन निर्णय-**

राज्यात केंद्र पुरस्कृत कृषि उन्नती योजना- कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणा करण्याकरिता सहाय्य (आत्मा) योजनेअंतर्गत मागणी क्र. टी-५, २४०१ पीक संवर्धन, ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) (१७) कृषि उन्नती योजना- कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तार विषयक सुधारणा करण्याकरिता सहाय्य उप अभियान ( केंद्र पुरस्कृत योजना) ( केंद्र हिस्सा ६०%) ( २४०१ A५१२), ३३ अर्थसहाय्य या योजनेअंतर्गत सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता अर्थसंकल्पित करण्यात आलेला रु. १२५.४७ लाख इतका निधी संदर्भीत वाचा क्र.४ येथे नमूद शासन निर्णयान्वये कृषि व पदुम विभागास वितरीत करण्यात आलेला आहे. सदर योजनेसाठी नोव्हेंबर,२०१८ च्या विधानमंडळ अधिवेशनात रु.५७.६० लाख इतका निधी पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे.

२. कृषि व पदुम विभागाच्या वाचा क्र. ४ येथील प्रस्तावास अनुसरुन केंद्र शासनाकडून प्राप्त निधीच्या अनुषंगाने सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता उपरोक्त योजनेसाठी (२४०१ A५१२), ३३ अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली रु. ५७.६० लाख ( अक्षरी रुपये सत्तावन्न लाख साठ हजार फक्त ) इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर (BEAMS ) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

३. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. विभागप्रमुख /नियंत्रण अधिकारी यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास; आदिवासी विकास विभाग व कृषि व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत सूचना देण्यात यावी.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर लक्ष ठेवता येईल.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतूद फक्त आदिवासी लाभार्थ्यांकरिता व आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी. तसेच आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेर केलेली तरतूद त्या क्षेत्रातील वैयक्तिक आदिवासी लाभार्थ्यांकरिताच खर्च करण्यात यावी.

६. उपरोक्त योजनेंतर्गत वितरीत केलेल्या केंद्र हिश्श्यास समरुप राज्य हिस्साकरिताचा आवश्यक निधी जिल्हा उपयोजनेंतर्गत वितरीत करण्यात आलेल्या निधीतून उपलब्ध करुन घेण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाने **वाचा** येथील क्रमांक १ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३७३/ अर्थोपाय, दि.३१.०७.२०१८अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२०४१३३१४७३०२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Digambarrao Aute

Digitally signed by Ravindra Digambarrao Aute
DN: cn=Ravindra Digambarrao Aute, o=Tribal Development Department, ou=Government of Maharashtra, email=rajendra.aute@nic.in, c=IN
Date: 2019.02.11 17:20:49 +05'30'

रविंद्र दि.औटे
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. सचिव ( कृषि ) कृषि व पदुम विभाग,मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त( कृषि) , महाराष्ट्र राज्य,पुणे.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
५. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८. वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
९. कार्यासन क्र. २ व ९/ निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई